॥ अथ शनिमाहात्म्य प्रारंभः ॥

श्रीगणेशायनमः ॥ ओंनमोजीगणनायका ॥ एकदंतावरदायका ॥ स्वरूपसुंदरा
विनायका ॥ करींकृपामजवरी ॥ १ ॥ आतांनमूंब्रह्मकुमारी ॥ हंसारूढवागीश्व
री ॥ वीणाशोभेदक्षिणकरीं ॥ विजयमूर्तिसर्वदा ॥ २ ॥ नमननमाझेंगुरुवर्या ॥
सुखमूर्तिकरुणालया ॥ नमूंसंतश्रोतियांच्यापायां ॥ अभेदभेदाकरूनी ॥ ३ ॥
आतांनमूंश्रीपांडुरंगा ॥ यावेंतुवांकथेचियाप्रसंगा ॥ निरसूनिमाझियाभवसं
गा ॥ करींकृपामजवरी ॥ ४ ॥ गुजरातभाषेचीकथा ॥ नवग्रहांचीतत्वतां ॥ ही
ऐकतांएकचित्ता ॥ संकटव्यथानबाधती ॥ ५ ॥ आतांउज्जयिनीनामनगरीं ॥ रा
जाविक्रमराज्यकरी ॥ तेथीलचरित्राचीपरी ॥ ऐकाचित्तदेऊनियां ॥ ६ ॥ कोणेए

श० केदिवशींप्रातःकाळीं ॥ बैसलीहोतीसभामंडळी ॥ तेथेंमहापंडितत्याकाळीं ॥ मा०
ल्हानथोरबैसले ॥ ७ ॥ ऐसीसभाबैसलीघनदाट ॥ तेथेंचर्चानिघालीसुभट ॥
॥ १ ॥ ह्मणतीनवग्रहांतकोणश्रेष्ठ ॥ सांगावेंनीटनिवडोनी ॥ ८ ॥ कोण्याग्रहाचीकै
सीस्थिती ॥ कैसीपूजाकैसीमती ॥ कोणरूपकैसीगती ॥ ऐसेंयथार्थसांगावें
॥ ९ ॥ ऐसेंऐकतांचिउत्तर ॥ पंडितसरसावलेसमोर ॥ काढोनिपुस्तकसंभार ॥
बोलतीतेयथामतीनें ॥ १० ॥ प्रथमएकपंडितबोलिला ॥ रविग्रहतोअसेभ
ला ॥ जोलागेत्याच्याउपासनेला ॥ त्यासिग्रहपीडानबाधी ॥ ११ ॥ रवितो ॥ १ ॥
सूर्यनारायण ॥ जेनरझालेतत्परायण ॥ त्यांचींविघ्नेंहोतीनिरसन ॥ महासाम

र्थ्यरवीचें ॥ १२ ॥ आधिव्याधिदरिद्र ॥ स्मरणमात्रेंचिहोतींदूर ॥ मगउपास
नाकरीजोनर ॥ चिंतिलेअर्थसर्वपुरती ॥ १३ ॥ रवितोमुख्यदैवत ॥ त्यावीण
सर्वहीजाणव्यर्थ ॥ नवग्रहआज्ञापाळित ॥ ऐसाश्रेष्ठग्रहहा ॥ १४ ॥ ऐकतांर
वीचीवार्ता ॥ आणित्याइतरग्रहांचीकथा ॥ तेणेंनिवारेसर्वव्यथा ॥ ऐसेनवही
ग्रहसमर्थ ॥ १५ ॥ परीरविअसेमहाबळी ॥ सर्वांमाजीअातुर्बळी ॥ प्रत्यक्षदि
सतोनेत्रकमळीं ॥ तोहासूर्यनारायण ॥ १६ ॥ तंवदुसरापंडितबोलत ॥ सोमासि
असेबळअद्भुत ॥ तोमाळीअसेह्मणवीत ॥ वनस्पतिपोषीतसे ॥ १७ ॥ जया
चेंआराध्यदैवत ॥ शिवसांबकैलासनाथ ॥ त्याच्याभाळींहाविलसत ॥ ह्मणो

श० निश्रेष्ठजाणावा ॥ १८ ॥ चंद्रवर्षेअमृतास ॥ तृप्तकरीसर्वदेवांस ॥ निशिराज मा०
महारूपस ॥ षोडशकलाजयासीं ॥ १९ ॥ तोनगांजीचकोणासी ॥ अतिसौ
॥ २ ॥ ख्यदातासर्वांसी ॥ सदासर्वदानिर्मलमानसीं ॥ धन्यजयाचेंपूजन ॥ २० ॥
मगतिसरापंडितबोलत ॥ ऐकरायासुनिश्चत ॥ मंगलतोमहासमर्थ ॥ कथाऐक
तयाची ॥ २१ ॥ मंगलग्रहहामहाक्रूर ॥ जैसीकांतेखड्गाचीधार ॥ तयाचानकळे
पार ॥ सर्वग्रहांमाजीवरिष्ठहा ॥ २२ ॥ मंगलग्रहसोनार ॥ क्रूरताजयाचीअति
थोर ॥ परीतोपूजकांसिकृपाकर ॥ मंगळकरीसर्वदा ॥ २३ ॥ जेगर्वधरूनिपूजा ॥ २ ॥
नकरिती ॥ मगतोखवळेउग्रमूर्ती ॥ विलयाजायसंततिसंपत्ती ॥ शेवटींनाशक

रीजीवित्वाचा ॥ २४ ॥ तोचिपूजकांसिसदाप्रसन्न ॥ सर्वअर्थकरीपावन ॥ सर्व
दुःखनिरसून ॥ अंतर्बाह्यसंरक्षी ॥ २५ ॥ तंवबोलेचवथापंडित ॥ बुधअसेमहा
बळवंत ॥ बुधाचाप्रतापअद्भुत ॥ सर्वग्रहांमाजी ॥ २६ ॥ बुधजातीचाअसेवा
णी ॥ नवग्रहांतशिरोमणी ॥ विघ्नेंनासतीतयाच्यापूजनीं ॥ सर्वानंदप्राप्तकरी
॥ २७ ॥ बुधज्यावरीकृपाकरी ॥ लक्ष्मीवंतत्यासिकरी ॥ ऐसातोमहापरोपका
री ॥ बुधग्रहजाणिजे ॥ २८ ॥ बुधग्रहआहेज्यासनीट ॥ सर्वमार्गसुचतीसु
भट ॥ कोणत्याकार्यासहीतूट ॥ तोनकरीकल्पांतीं ॥ २९ ॥ बुधाचीबुद्धिभारी ॥
कोणासीनिष्ठुरतातोनकरी ॥ संसारचिंताहरी ॥ प्राणिमात्रांची ॥ ३० ॥ मगबोले

पांचवापंडित ॥ गुरूचेंसामर्थ्यअसेअद्भुत ॥ गुरूतोश्रेष्ठसर्वांत ॥ इंद्रादिदेवां
समस्तां ॥३१॥ गुरुज्ञानाचानकळेपार ॥ आविकांसितोकरुणाकर ॥ कर्मअकर्मा
चाकरीचूर ॥ भवभयव्यथेसीं ॥ ३२ ॥ दुःखआणिदारिद्र्यरोग ॥ स्मरणमात्रेंहो
यभंग ॥ नवग्रहांतमहायोग्य ॥ ऐसाजाणिजे ॥ ३३ ॥ गुरुजातीचाअसेब्राह्म
ण ॥ सर्वांतश्रेष्ठअसेवर्ण ॥ सर्वदेवकरितीमान्य ॥ गुरुवचनासी ॥ ३४ ॥ गुरु
असेज्ञानाचापुरा ॥ तयाच्यासाम्यासिनसेदूसरा ॥ त्यापुढेंनुरेचिथारा ॥ कल्प
नेचाकदाही ॥ ३५ ॥ ह्मणोनिकरितांगुरुसेवा ॥ मगग्रहांचाकोणकेवा ॥ गुरुस
र्वभावेंभजवा ॥ तेणेंसंतोषसर्वग्रहांसी ॥ ३६ ॥ शिवकरीगुरुपूजनासी ॥ तेथें

पाडकायइतरांसीं ॥ ऐसाश्रेष्ठजोसर्वांसी ॥ आगमागम ॥ ३७ ॥ तंवसहावापं
डितबोलिला ॥ शुक्रग्रहअसेबहुभला ॥ जेणेंराक्षसांउपकारकेला ॥ संजीवनी
मंत्रेंकरोनी ॥ ३८ ॥ शुक्रगुरूतोदैत्यांचा ॥ त्रिभुवनींधाकवाहतीजयाचा ॥ पा
रनकळेसामर्थ्याचा ॥ ह्मणोनिश्रेष्ठतो ॥ ३९ ॥ शुक्राचीशक्तिआहेफार ॥ तोक
रीकर्माकर्माचाचूर ॥ विघ्नेंपळतीदूरच्यादूर ॥ शुक्राचेंनामघेतां ॥४०॥ शुक्रपूजनीं
जेतत्पर ॥ त्यांच्याशौर्यासिनाहींपारावार ॥ जोदिव्यदेहीनिरंतर ॥ एकाक्षतो
॥ ४१ ॥ आधिव्याधिदुःखदरिद्र ॥ स्मरणमात्रेंचहोतीदूर ॥ सर्वाभीष्टपरिक
र ॥ प्राप्तकरीपूजकां ॥ ४२ ॥ नवग्रहांतशिरोमणी ॥ ज्याचामहिमावर्णिजेपुरा

श० णीं ॥ मान्यताश्रेष्ठसर्वांहुनी ॥ शुक्राचीअसेजाणपा ॥ ४३ ॥ ऐसेहेसहाग्रहऐ मा०
कोनिराजा ॥ तर्जनीमस्तकडोलवीवोजा ॥ ह्मणेउत्तमकथिलेंकाजा ॥ अखंडित
॥ ४ ॥ यांतेंस्मरावें ॥ ४४ ॥ आणिकग्रहराहिलेकोण ॥ सांगापंडितहोनिवडून ॥ कै
सींत्यांचींनामेंखूण ॥ त्यामूर्तींसिबोलिजे ॥ ४५ ॥ मगसंकेतेंबोलेपंडित ॥ राहु
आणिदुसराकेत ॥ हेउभयतांअतिअद्भुत ॥ दैत्यकुळींचेअसती ॥ ४६ ॥ मातं
गजातीचेदोन्ही ॥ दुष्टक्रियाह्मणोनी ॥ त्यांच्यादर्शनेंचंद्रसूर्यगगनीं ॥ चळच
ळांकांपतीं ॥ ४७ ॥ राहुपीडीचंद्रासी ॥ केतुतोसूर्यासी ॥ ग्रहणबोलिजेतया ॥ ४ ॥
सी ॥ प्रत्यक्षदृष्टीसिदिसतसे ॥ ४८ ॥ प्राणिमात्रसर्वजन ॥ त्यांसिनसांडिती

पीडेविण ॥ परीकेलियापूजनस्मरण ॥ किंचित्पीडाकरिताती ॥ ४९ ॥ राहुमहा
पीडकअनिवारमाया ॥ त्तद्रूपचिकेतुजाणराया ॥ उभयतांचीएकचर्या ॥ पूजन
स्मरणेंसंतोषती ॥ ५० ॥ सर्वग्रहांपरीसअतिक्रूर ॥ जनांसिपीडाकरितीफार ॥
ह्मणोनिपूजनस्मरणनिरंतर ॥ राहुकेतूंचेंकरावें ॥ ५१ ॥ तंवनववापंडितबोल
त ॥ शनिग्रहश्रेष्ठअवघ्यांत ॥ बलाढ्यहोयअद्भूत ॥ नकळेकळातयाची ॥५२॥
तोज्यावरीकरीकृपा ॥ त्यासिसर्वमार्गअसेसोपा ॥ ग्रहदिक्पाळांवरछापा ॥ तया
शनिग्रहाचा ॥ ५३ ॥ ज्यावरतोकोपासिचढे ॥ तयावरीनानाविघ्नेंहोतीरोक
डे ॥ तयाचासंसारबिघडे ॥ नराहेकल्पांतीं ॥ ५४ ॥ शनिदेवमहाक्रोधी ॥ ज्या

चापराजयनोहेयुद्धीं ॥ देवदानवांत्रिशुद्धीं ॥ दुःखदाताशनिदेव ॥ ५५ ॥ जो
भाविकसज्ञाननर ॥ तोयाग्रंथाचाकरीआदर ॥ पूजनस्मरणनिरंतर ॥ त्यावरकृ
पाकरीशनिदेव ॥ ५६ ॥ शनैश्वराचीमूर्तिकाळी ॥ तोजातीचाहोयतेली ॥ चर
णपंगुसुरतचांगली ॥ पूजाकरीकाळभैरवाची ॥ ५७ ॥ त्याचीदृष्टीपडेजयावर ॥
करीतयाचाचकनाचूर ॥ अथवाकृपाकरीजयावर ॥ तयासिसर्वआनंदप्राप्तहोय
॥ ५८ ॥ दृष्टीचाऐकाचमत्कार ॥ जन्मलाजेव्हांशनैश्वर ॥ तेव्हांदृष्टिपडलीपि
त्यावर ॥ तेणेंकुष्ठभरलेंसर्वांगीं ॥ ५९ ॥ पित्याच्यारथींहोताजोसारथीं ॥ तो
पांगुळाझालानिश्चितीं ॥ अश्वाचियानेत्राप्रती ॥ अंधत्वआलेंतत्क्षणी ॥ ६० ॥

तेव्हांत्यांनींउपायकेलेफार ॥ तरीगुणनयेचिअणुमात्र ॥ जंवदृष्टीफिरवीशनैश्व
र ॥ तंवतिघेहीआरोग्यझाले ॥ ६१ ॥ ऐसेंऐकतांराजाविक्रम ॥ हांसूनिबोलेस
प्रेम ॥ ह्मणेपुत्रजन्मोनिकायकाम ॥ ऐसाअपवित्रजो ॥ ६२ ॥ तोपुत्रनव्हेकेव
ळवैरी ॥ जोउपजतांचऐसेंकरी ॥ पुढेंतोकायनकरी ॥ सांगापंडितहो ॥ ६३ ॥
ऐसेंबोललाहांसून ॥ करींटाळीवाजवीगर्जोन ॥ सभेसिविनोदवचन ॥ ह्मणेहा
पुत्रकैसाहो ॥ ६४ ॥ ऐसेंबोलतांतेअवसरीं ॥ कैसीवर्तलीनवलपरी ॥ तीऐका
वीआतांचतुरीं ॥ चित्तदेऊनियां ॥ ६५ ॥ त्यासमयींशनिदेवविमानीं ॥ जात
होतेबैसोनी ॥ रायाचेंवाक्यऐकतांतत्क्षणीं ॥ विमानखालींउतरिलें ॥ ६६ ॥ अ

कस्मात्‌येऊनियांसमेंत ॥ बैसलेतेव्हांविमानासहित ॥ तंवपहातेजाहलेसभा
पंडित ॥ ह्मणतीआलेशनिदेव ॥ ६७ ॥ मगरावउठेझडकरोनी ॥ जाऊनिनम
नकरीचरणीं ॥ तंवटाकिलाझिडकारोनी ॥ शनिदेवानें ॥ ६८ ॥ ह्मणेतूंराजाऐ
सामस्त ॥ टवाळीकरिसीअद्भुत ॥ याचाचमत्कारक्षणांत ॥ दाविनपाहेंआतां
चि ॥ ६९ ॥ तूंफारकरितोसीटवाळी ॥ नसतीचचढविलीकळी ॥ परीकन्याररा
शिसिमूळीं ॥ तुजलाग्रहमीआलों ॥ ७० ॥ तरीआतांपाहेमाझाचमत्कार ॥ तूंन
कोकरूंगर्वफार ॥ ऐसेंवदोनिअतिसत्वर ॥ विमानारूढपैंझाला ॥ ७१ ॥ तं
वतोरावलागेचरणासी ॥ ह्मणेकृपाकरावीदीनासी ॥ अन्यायघालींपोटासी ॥

कृपाळुवाशनिदेवा ॥ ७२ ॥ तरीतोनमानीचशनिदेव ॥ ह्मणेमीतुजदाखवीन
अनुभव ॥ तेव्हांमनींखिन्नजाहलाराव ॥ चिंतामानसींफारकरी ॥ ७३ ॥ म
गह्मणतसेपंडितांला ॥ आह्मींमहाग्रहभंगाचिछळिला ॥ तोआतांकष्टवीलआ
ह्मांला ॥ तरीकैसेंकरावेंआतां ॥ ७४ ॥ जेंजेंपुढेंहोणार ॥ ह्मणोनिबुद्धिसुचेतद
नुसार ॥ तरीजेंअसेललिखिताक्षर ॥ तैसेंआतांहोईल ॥ ७५ ॥ रावदिलगीरजा
हलामानसीं ॥ विसर्जनकरीसभेसी ॥ जाताजाहलामंदिरासी ॥ कांहींअंतरींसु
चेना ॥ ७६ ॥ करूनियांसंध्यास्नान ॥ मगकरीतसेभोजन ॥ तदनंतरकरिताजा
हलाशयन ॥ नावेकपलंगावरी ॥ ७७ ॥ ऐसेंकरितांएकमास ॥ जाहलारायावि

क्रमास ॥ मगकायवर्तलेंआसमास ॥ तेंचिआतांऐकिजे ॥ ७८ ॥ रायाविक्रमा
सीआलाशनी ॥ बारावाअतिक्रूरस्थानीं ॥ जेणेंत्रासिलेबहुतप्राणी ॥ अभावि
कांपीडितसे ॥ ७९ ॥ तेंव्हांपंडितबोलतीवाचे ॥ रायापूजनकरींशनिग्रहाचें ॥
साडेसातवर्षैंनेमाचें ॥ सामर्थ्यआहेजाणिजे ॥ ८० ॥ तुह्मींविनोदेंहांसलांश
नीसी ॥ तरीतोकष्टवीलतुह्मांसी ॥ जोगांजितोत्रैलोक्यासी ॥ तोचिहामहाग्रह
॥ ८१ ॥ चित्तकरोनियांएकाग्र ॥ ऐकावापूजेचाप्रकार ॥ जेणेंकरोनिशनैश्वर ॥
कृपाकरीलतुह्मांवरी ॥ ८२ ॥ प्रथमकरोनिऔषधीस्नान ॥ मगकरावेंप्रतिमेचेंपू
जन ॥ अश्वाचानालघेऊन ॥ त्याचीप्रतिमाकरावी ॥ ८३ ॥ शास्त्रविधिपूजा

निर्धार ॥ मगतैलअभिषेककर ॥ मृत्तिकेच्याकुंभावर ॥ त्याचीस्थापनाकरावी
॥ ८४ ॥ स्थापनाझालियाजाण ॥ पूगीफलब्राह्मणासिदेऊन ॥ तेवीससहस्र
जपसंपूर्ण ॥ यथासांगकरावा ॥ ८५ ॥ जपसंख्याझालियावरी ॥ चतुर्थांशहव
नकरीं ॥ हवनझालियाउपरी ॥ दानेंकरावींशनीचीं ॥ ८६ ॥ मगजपकर्त्यांब्रा
ह्मणासी ॥ शनैश्वररूपमानूनित्यासी ॥ दक्षिणादेऊनिपूजेसीं ॥ प्रसन्नचिकरा
वें ॥ ८७ ॥ मगकरावेंब्राह्मणभोजन ॥ यथाशक्तिद्यावेंदान ॥ ब्राह्मणतृप्तहोतां
पूर्ण ॥ संतोषपावेशनिदेव ॥ ८८ ॥ जेवींरक्षीबाळकासिमाता ॥ तैसेंरक्षीनिज
भक्ता ॥ पंडितह्मणतीरायासमर्था ॥ गोष्टीएवढीऐकावी ॥ ८९ ॥ राजाह्मणेपं

शं० डितांला ॥ शनिनमानीचआह्मालां ॥ तोचिमातापितावाहिला ॥ रक्षीतोचिपैं मा०
जाणा ॥ ९० ॥ मगबोलेविक्रमपंडितांसी ॥ तुह्मींजावेंआपुल्यागृहासी ॥ जें
॥ ८ ॥ होणारअसेलतेंनिश्चयेंसी ॥ घडूनियेईलनटळेचि ॥ ९१ ॥ ऐसेंबोलोनियांउ
त्तर ॥ कायझालाचमत्कार ॥ चित्तकरूनियांस्थिर ॥ श्रवणकरावेंसर्वांहीं ॥ ९२ ॥
असोमगकोणेएकेदिवशीं ॥ दोनप्रहरांच्यासमयासीं ॥ कारवानवेषेंउज्जयिनी
सी ॥ घोडेविकावयाआलाशनिदेव ॥ ९३ ॥ रूपपालटोनिआपुलें ॥ वारूवि
कावयाआणिले ॥ तंवतेथेंगिऱ्हाईकपातले ॥ रावहिआलात्यास्थानीं ॥ ९४ ॥ ॥ ८ ॥
तेव्हांकिंमतपुसतसेरावो ॥ तयासिह्मणेशनिदेवो ॥ वारूफिरवूनिपहाहो ॥ म

गकळेलमोलतयाचें ॥ ९५ ॥ तेव्हांसारंगावारूआणवित ॥ चाबुकस्वारासि
वरीबैसवित ॥ तेणेंघोडाफिरविलाचौगानांत ॥ अतिउत्तमफिरतसे ॥ ९६ ॥ तं
वदुसराघोडाअबलख ॥ त्याचेंमोलरुपयेलक्षएक ॥ तोसोडोनितात्काळिक ॥
आणिलाविक्रमापासीं ॥ ९७ ॥ तंवत्यासौदागरेंकायकेलें ॥ रायाविक्रमासींच
बैसविलें ॥ घोडाफिरवितांरावबोले ॥ अतिउत्तमफिरतसे ॥ ९८॥ तंवत्याघो
ड्यासिकोरडामारित ॥ तेव्हांघोडाउडालागगनपंथ ॥ पवनवेगेंवारूजात ॥ म
हावनांततेसमयीं ॥ ९९ ॥ अधिककोरडामारितां ॥ तोंतोंअधिकजायपंथा ॥
थोरअवस्थाहोतचित्ता ॥ कैंचींवर्तलेंह्मणवोनी ॥ १०० ॥ दूरदेशअतिउजाडी ॥

श० जेथेंघोरवनमहाझाडी ॥ तेथेंनदीच्यापैलथडी ॥ घोडाजाऊनिउतरला ॥ १ ॥ मा०
तेथेंरावउतरलाखालीं ॥ तंवनवलपरीवर्तली ॥ वारूनाहींनदीगुप्तजाहली ॥ झा
॥ ९ ॥ डाझुडांसहित ॥ २ ॥ तेव्हांआश्चर्यवाटलेंविक्रमासीं ॥ ह्मणेईश्वरीगतिनकळे
कोणासी ॥ वारूआणिवनासी ॥ कायाविचारपैंजाहला ॥३॥ तंवअस्तासिपाव
लावासरमणी ॥ अंधकारप्रवर्तलीरजनी ॥ पुढेंमार्गनदिसेनयनीं ॥ मगतेथेंचिप
हुडला ॥ ४ ॥ चारप्रहरगेलियावरी ॥ उदयासिआलातमारी ॥ मगतोएकानग
राचामार्गधरी ॥ राजाविक्रमआपण ॥ ५ ॥ तंवतेथोनिचारयोजनेंदूरी ॥ ताम ॥ ९ ॥
लिंदानामनगरी ॥ तेथेंजाताजाहलातेअवसरीं ॥ हळूहळूपोहोंचला ॥६॥ इक

डेउज्जयिनीचीकथाराहिली ॥ तीआतांपाहिजेश्रवणकेली ॥ नगरजनेंवाटपाहि
ली ॥ चारप्रहररायाची ॥ ७ ॥ तेव्हांसौदागरह्मणेप्रधानासी ॥ वारूद्याआमुचा
आह्मांसी ॥ कोणीकडेनेलेंवारूसी ॥ रायाविक्रमानें ॥ ८ ॥ तंवपाहतेझालेनगरा
बाहेर ॥ कोसींदोकोसींकोसचार ॥ परीकोठेंनदिसेराजेश्वर ॥ मगचिंताप्रवर्त
ली ॥ ९ ॥ तेव्हांसौदागरह्मणेप्रधानासी ॥ सत्वरशोधोनिआणारायासीं ॥ ना
हींतरीआह्मांसी ॥ पैकाद्यावावारूचा ॥ ११० ॥ तेव्हांप्रधानासपडलीचिंता ॥
मनींह्मणेकैसेंकरावेंआतां ॥ रायाचाशोधनलागेतत्वतां ॥ सौदागरेंअडविलें ॥
॥ ११ ॥ मगप्रधानेंकायकेलें ॥ सौदागरासीबोलाविलें ॥ ह्मणेवारूचेंमोलकाय

वहिलें ॥ तेंसांगआह्मासीं ॥ १२ ॥ तयानेंमोलसांगतांचिझडकरी ॥ मगपैका
घातलातयाचेपदरीं ॥ तेव्हांप्रधानासिपुसोनिसत्वरी ॥ जाताजाहलाशनिदेव
 ॥ १३ ॥ सौदागरगेलियापाठीं ॥ मागेंकायवर्तलीगोष्टी ॥ नगरजनसर्वहोतीं
कष्टी ॥ देशपट्टनेंधुंडिलीं ॥ १४ ॥ नगरींजाहलीऐसीपरी ॥ इकडेराजाविक्रम
कायकरी ॥ तयातामलिंदापुरनगरीं ॥ ग्रामामाजीप्रवेशला ॥ १५ ॥ तंवतेथेंव्य
वहारीसावकार ॥ जातीचावैश्यधनाढ्यथोर ॥ तेव्हांतयाचेदुकानावर ॥ राजा
नावेकस्थिरावला ॥ १६ ॥ सावकाराचेदुकानीं ॥ विक्रीहोतसेद्विगुणी ॥ त्याणें 
भलामाणूसजाणोनी ॥ आदरकेलातयाचा ॥ १७ ॥ मगव्यवहारीबोलेभावें ॥

तुह्मींआतांमुखमार्जनकरावें ॥ जातीचेकोणआह्मांसांगावें ॥ नामग्रामतुमचेंपैं ॥ १८ ॥ राजाह्मणेतयावैश्यासीं ॥ आह्मींक्षत्रियअसोंपरियेसीं ॥ आमचामुलुखअसेदूरदेशीं ॥ क्षणएकयेथेंउतरलों ॥ १९ ॥ मगसावकारेंकरविलापाक ॥ अतिउत्तमषड्रसादिक ॥ भातपुन्यासांडगेदेख ॥ करविलेबहुतप्रकार ॥ १२० ॥ मगतोवैश्यह्मणेक्षत्रिया ॥ उठावेगींजेवावया ॥ भोजनकरूनलवलाह्या ॥ मगजावेंसुखरूप ॥ २१ ॥ मगरावकरीसंध्यास्नान ॥ सत्वरसारिताजाहलाभोजन ॥ उत्तमप्रकारचेंपक्कान्न ॥ सेवूनितृप्तीपावला ॥ २२ ॥ तेव्हांवैश्यह्मणेक्षत्रियासी ॥ सत्यसांगावेंआह्मांसी ॥ मगविक्रमेंयथार्थकथिलेंतयासी ॥ तेव्हांतो

निजअंतरींसमजला ॥ २३ ॥ आतांत्यासावकाराचीकन्यका ॥ नामतिचेंअलो
लिका ॥ तिचापणहाचिदेखा ॥ इच्छिलावरवरावा ॥२४॥ परीतिसींनामिळेइ
च्छावर ॥ वैश्यशोधकरीनिरंतर ॥ तंवहाविक्रमराजापरिकर ॥ ह्मणेयासिद्या
वीकुमारिका ॥ १२५ ॥ तेव्हांतोबोलेकुमारिकेसी ॥ बाईउत्तमवरआणिलातुज
सी ॥ आतांतूंमाळघालींयासी ॥ नकरींअनमान ॥ २६ ॥ हास्वरूपेंआहेसुंद
र ॥ बत्तीसलक्षणींपरिकर ॥ हाभाग्यवंतजाणवर ॥ यासिवरींकुमारिके ॥२७॥
तेव्हांकुमारीबोलेपित्यासी ॥ तुह्मींबहुतवर्णितांयासी ॥ परीनभरतांममानसीं
॥ तंवनवरींत्यासिनिर्धारें ॥ २८ ॥ आजपाहीनयाचेंलक्षण ॥ कैसेंचातुर्यकाय

ज्ञान ॥ भाषणावरूनिप्रमाण ॥ सर्वकळोनियेईल ॥ २९ ॥ ऐसेंवदतांझालीसां
ज ॥ तंवअस्तासिगेलाभानुराज ॥ पित्यासिह्मणेमहाराज ॥ पांथिकासीपाठ
वावें ॥ १३० ॥ मगवैश्यह्मणेक्षत्रियासी ॥ जावेंनिद्राकरावयासी ॥ अतिरम्य
चित्रशाळेसी ॥ तेथेंसर्वविदितहोईल ॥ ३१ ॥ मगतोविक्रमउठोंनिचालिला ॥
जेथेंहोतीचित्रशाळा ॥ तेथेंहंसमयूरकोकिळा ॥ नानाप्रकारचेलेपिले ॥ ३२ ॥
चित्रेंरेखिलींबहुकुशळता ॥ वारूआणिगजरथा ॥ चित्रकारेंचित्ररेखितां ॥ आळ
सकांहींनकेला ॥ ३३ ॥ पुढेंपाहेराजानयनीं ॥ तंवअपूर्वमंचकदेखिलातत्क्षणीं ॥
त्यावरपासोडालेपदोन्ही ॥ आंथरुणघातलेंसे ॥ ३४ ॥ रत्नखचितसुरंगपलंग ॥

 त्यावरीनानापरीचेरंग ॥ जाईजुईपुष्पसुरंग ॥ सेजकेलीअतिनिगुती ॥ ३५ ॥ 
वरतीलोंबतीमोतियांचेघड ॥ चांदवाकरीतसेफडफड ॥ समयाजळतीधडधड ॥
 चतुष्कोणींचारपैं ॥ ३६ ॥ ऐसेंपाहूनिरावझालाचकित ॥ ह्मणेनकळेकायआहेवृ
त्तांत ॥ हाकोणदेशकोणतीगत ॥ होईलतीकळेना ॥ ३७ ॥ कर्माच्यागतीगह
ना ॥ जेंजेंहोणारतेंकदाचुकेना ॥ तेंतेंभोगिल्यावीणसुटेना ॥ देवांदिकांसर्वांसी
॥३८॥तरीहेंशनिदेवाचेंछळण ॥ त्यानेंहीरचिलीमायाजाण ॥ आतांहोणारतेंहो
यआपण ॥ जोसर्वांसिपीडितसे ॥ ३९ ॥ ऐसामनींकरोनिविचार ॥ मगनिद्रा 
करीराजेश्वर ॥ तयापलंगींसाचार ॥ सावधाननिजअंतरीं ॥ १४०॥ नानापरी

चेकरीविचार ॥ बुद्धीचेतरंगअपार ॥ ह्मणोनिनिद्रानयेसाचार ॥ परीमुखआ
च्छादनकेलेंसे ॥ ४१ ॥ रायेंकेलीऐसीपरी ॥ मगवैश्यकन्यकाकायकरी ॥ पंचा
रतीघेऊनिकरीं ॥ आलीरंगमहालाकारणें ॥ ४२ ॥ तिणेंकेलासर्वश्रृंगार ॥ ग
ळांशोभतीमोतियांचेहार ॥ केशरकस्तूरीकर्पूर ॥ सुगंधद्रव्येंआणिलींपैं ॥४३॥
पायींपैंजणनेपुरें ॥ तींझणत्कारकरितीगजरें ॥ पदकासिजडिलेदिव्यहिरे ॥ त्यां
चेंतेजफांकतसे ॥ ४४ ॥ तीजैसीपुतळीचकेवळ ॥ बत्तीसलक्षणीवेल्हाळ ॥ मृ
गनयनाभाळविशाळ ॥ येऊनिउभीठाकली ॥ ४५ ॥ रावनिद्रेचेंमिषकरून ॥
पलंगींपहुडलासेजाण ॥ तोनउठेऐसेंजाणून ॥ मगकुमारिकाकायकरी ॥ ४६ ॥

चंदनपात्रघेऊनिहातीं ॥ अलोलिकाहोयशिंपिती ॥ तरीजागानहोयनृपती ॥
कोणेंहीप्रकारेंकरोनी ॥ ४७ ॥ ऐसीएकप्रहरझालीकष्टी ॥ जागानहोयमगझा
लीहिंपुटी ॥ मुक्ताहारठेवूनिखुंटी ॥ निद्राकरीसचिंत ॥ ४८ ॥ तंवनिद्राआली
कामिनीसी ॥ मगरावउघडितांमुखासी ॥ विचारकरीनिजमानसीं ॥ मीसत्वधी
रह्मणवितों ॥ ४९ ॥ परोपकारीमाझेंमन ॥ पापासभितोंरात्रंदिन ॥ हीतंवक
न्याअसेजाण ॥ कैसेंभाषणकरावें ॥ १५० ॥ ऐसाविचारकरीनिजमानसीं ॥ तं
वतोनिद्राभरकामिनीसी ॥ मगपाहताझालाचित्रांसी ॥ तेथेंअपूर्ववर्तलें ॥ ५१ ॥
चित्रींचाहंसनिर्जीव ॥ परीतोकायकरिताजाहलालाघव ॥ खालींउतरोनिसाव

यव ॥ हाराचींमोत्येंभक्षीतसे ॥ ५२ ॥ रावपाहूनिजाहलाचकित ॥ मनींह्मणे
हेआश्चर्यमात ॥ परीहीगोष्टीअनुचित ॥ दुःखदायकआपणासीं ॥ ५३ ॥ जरी
हारघ्यावाकाढुनी ॥ तरीब्रीदजातसेनिरसुनी ॥ परासिसुखद्यावेंह्मणवोनी ॥ ब्री
दअसेमाझेंहें ॥ ५४ ॥ परंतुगोष्टीहेअघटित ॥ आपणादुःखहोईलप्राप्त ॥ तेंग्र
हदशेचेंमानसत्य ॥ परीहारनकाढावा ॥ ५५ ॥ ऐसानिश्चयरायेंकेला ॥ इकडे
सर्वहारहंसेंगिळिला ॥ तेंपाहोनिरावनिजला ॥ कुमारिकेशेजारीं ॥ ५६ ॥ तंव
उगवलाअसेदिन ॥ कुमारीउठलीखडबडोन ॥ ह्मणेहापित्यानेंवरआणिलाजा
ण ॥ अतिमूर्खनपुंसक ॥ ५७ ॥ मनींक्रोधआलाभारी ॥ उठोनिचाललीझडक

री ॥ तंवतीहारपाहेखुंटीवरी ॥ तेथेंकांहींदिसेना ॥ ५८ ॥ हारनदेखेकुमारिका ॥
तीह्मणेपांथिकाअविवेका ॥ हारघेऊनिमहाठका ॥ निद्राकेलीसुखरूप ॥ ५९ ॥
तरीहारदेईमाझाझडकरी ॥ तुजपचणारनाहींचोरी ॥ ऐसियागोष्टीनेंतुझीथो
री ॥ राहणारनाहींतत्वतां ॥ १६० ॥ तरीहारदेमाझामजप्रती ॥ मगत्वांजावें
आपुल्यापंथीं ॥ याचीचर्चाझालियानिश्चितीं ॥ नाशहोईलशरीराचा ॥ ६१ ॥
तंवपांथस्थह्मणेकुमारिका ॥ हारनाहींआह्मांसिठाउका ॥ येथेंनिद्राकेलीह्मणो
निदेखा ॥ आळघालिसीआह्मांवरी ॥ ६२ ॥ तंवतीकुमारीसंतप्तमनीं ॥ पि
त्यासिसांगेतत्क्षणीं ॥ ह्मणेइच्छावरआणिलामजलागुनी ॥ त्याचेंलक्षणआति

उत्तम ॥ ६३ ॥ तुह्मींठकचोरआणिलाघरा ॥ तोतस्करविद्येमाजीपुरा ॥ तेणेंचो
रिलेंमाझियेहारा ॥ तरीतोमागुनीघेईजे ॥ ६४ ॥ तेव्हांवैश्यह्मणेपांथिकासी ॥
तुजविश्रामदिधलाकासयासी ॥ तरीतूंकांहारघेऊनीबैसलासी ॥ बराझालासी
उतराई ॥ ६५ ॥ उत्तमभोजनदिधलेंदेखा ॥ आणिहीअर्पिलीनिजकन्यका ॥
ऐसेंअसतांमहामूर्खा ॥ हेंकायआचरलासी ॥ ६६ ॥ बराचफेडिलाउपकार ॥
देईमाझेकन्येचाहार ॥ मगत्वांजावेंसत्वर ॥ आलियापंथें ॥ ६७ ॥ तंवरावह्म
णेसावकारासी ॥ तुमचाहारनाहींमजपासीं ॥ हाकर्मभोगओढवलासायासीं ॥
नसतेंचविघ्नहें ॥ ६८ ॥ तेव्हांसावकारासींक्रोधआला ॥ तेणेंसेवकांसींहुकूम

केला ॥ बंधनकरावेंयातस्कराला ॥ मारद्यावानिष्ठुरपणें ॥ ६९ ॥ यासिमारि
ल्यावांचून ॥ हारहस्तगतनहोयजाण ॥ हापक्काचोरह्मणोन ॥ ऐसेंलक्षणपैंया
चें ॥ १७० ॥ मगत्यासेवकींधांवोनिसत्वर ॥ बांधिलातोमुशाफर ॥ अतिशय
दिधलामार ॥ दयानाहींअंतरीं ॥ ७१ ॥ तेमारितीनिष्ठुरहोउनी ॥ दयानाहीं
अंतःकरणीं ॥ मारामाराऐशावचनीं ॥ वैश्यतेव्हांबोलत ॥ ७२ ॥ मारमारूनि
केलाजर्जर ॥ ह्मणतीहारदेईगासत्वर ॥ महानिर्दयनिष्ठुर ॥ दयानयेकोणासीं
॥ ७३ ॥ मगरावह्मणेवैश्यासी ॥ हारनाहींगाआह्मांपासीं ॥ कष्टवितोसिशरी
रासी ॥ वृथाचिजाणकासया ॥ ७४ ॥ तैंवैश्यह्मणेसेवकांला ॥ हापक्कातस्कर

नव्हेभला ॥ अद्यापिनाहींकबूलआला ॥ मारखातोनिःशंक ॥ ७५ ॥ मगतो
व्यवहारीकायकरी ॥ जाऊनिरायाचेदरबारीं ॥ रायाचंद्रसेनाश्रुतकरी ॥ सां
गेसकळवर्तमान ॥ ७६ ॥ तेंऐकोनिराजेश्वर ॥ ह्मणेआणावातोतस्कर ॥ ऐसें
वचनऐकोनसत्वर ॥ सेवकांचीमदीधांवली ॥ ७७ ॥ त्यांनींबंधनकरूनिविक्र
मासी ॥ आणितेजाहलेरायापाशीं ॥ मगप्रणिपातकेलावेगेंसीं ॥ संमुखउभारा
हिला ॥ ७८ ॥ मगरावबोलेपांथिकासी ॥ हारआहेकींतुजपासीं ॥ तोदेईआ
तांसावकारासी ॥ प्राणवांचवींआपुला ॥ ७९ ॥ तंवविक्रमबोलेवचना ॥ ऐक
रायाचंद्रसेना ॥ हारघेतलानाहींजाणा ॥ असत्यनबोलेंकदाही ॥ १८० ॥ हा

राचासांगावाविचार ॥ तरीवृथाह्मणालतुह्मींसर्वत्र ॥ नघडेतोचिविचार ॥ घड
लाअसेसमर्था ॥ ८१ ॥ आह्मांसिग्रहनाहींसानुकूळ ॥ नसतीउत्पन्नहोतेकळ॥
त्याचीकायकरूनिहळहळ ॥ होणारतेंहोतसे ॥ ८२ ॥ बरेंचोरीनकरावीपरं
तुकेली ॥ परीआतांपाहिजेक्षमाकेली ॥ सर्वअपराधपोटींघालीं ॥ कृपाकरींम
हाराजा ॥ ८३ ॥ ऐसेंऐकतांवचनराजेश्वर ॥ क्रोधेंसंतप्तजैसाखदिरांगार ॥ ग
र्जनाकरोनिसत्वर ॥ कायबोलताजाहला ॥ ८४ ॥ सेवकांसिह्मणेउठासत्वर ॥
तोडायाचेचरणकर ॥ टाकूनद्यानगराबाहेर ॥ अन्नउदकनद्यावें ॥ ८५ ॥ ऐसा
रायाचाअविवेक॥ मूढमतीतिसकळिक॥ नाहींकोणाहींभाविक ॥ यथाराजातथा

प्रजा ॥ ८६ ॥ तरीराजाचेमुखींशनैश्वर ॥ सूचूंनदेकांहींविचार ॥ तोचिपीडाक
रीवारंवार ॥ दुःखदेतरायातें ॥ ८७ ॥ ऐसेंचंद्रसेनाचेंउत्तरऐकोनी ॥ सेवकउठि
लेझडकरोनी ॥ रायाविक्रमासीचालिलेघेउनी ॥ तयानगराबाहेर ॥ ८८ ॥ ने
ऊनियांनगरप्रदेशीं ॥ तोडितेझालेकरचरणांसी ॥ अश्रुयेतीजनांच्यानयना
सी ॥ महासंकटओढवलें ॥ ८९ ॥ असोहातपायचारी ॥ तोडिलेतेव्हांनिष्ठुरीं ॥
टाकोनिग्रामाबाहेरी ॥ सेवकआलेसांगावया ॥ १९० ॥ मगराजापुसेसेवकां
ला ॥ तोमेलाकिंवावांचला ॥ त्याचाप्राणकोठेंउरला ॥ ऐसेंबोलेउत्तर ॥ ९१ ॥
मगसेवकह्मणतीमहाराज ॥ सत्वरचिप्राणजाईलसहज ॥ करचरणावीणअ

शु०

॥१७॥

त्मराज ॥ कैसेंसुखपावेल ॥ ९२ ॥ खाण्यावीणहैराण ॥ शरारींपीडाअतिदारु
ण ॥ तळमळकरीरात्रंदिन ॥ महादुःखहोतसे ॥ ९३ ॥ इकडेराजाविक्रमकाय
करी ॥ हातापायांचेंदुःखभारी ॥ जैसामत्स्यतळमळकरी ॥ उदकावीणजाणपां
॥ ९४ ॥ कोणीयेतातीवाटसरू ॥ त्यांनींपाहतांयेतगहिंवरू ॥ तेह्मणतीहेपर
मेश्वरू ॥ कोणकष्टयाप्राणियासी ॥ ९५ ॥ जरीअन्नउदककोणीद्यावें ॥ तरीरा
यैंत्यासींदंडावें ॥ ताडनबंधनकरावें ॥ ऐसाधाकजनांसीं ॥ ९६ ॥ ऐसेंअसतां
झालाएकमास ॥ अतिदुःखहोतसेविक्रमास ॥ परीदयानयेकोणास ॥ ग्रहदशा
ह्मणवोनी ॥ ९७ ॥ रावविक्रमशोककरी ॥ ह्मणेग्रहासमर्थाकृपाकरीं ॥ निष्ठुरन

मा०

॥१७॥

व्हावेंनिजांतरीं ॥ दयाकरींदीनांस ॥९८॥ ऐसीकरुणाभाकितांतयेवेळीं ॥ म
गशनैश्वरासीकृपाआली ॥ ह्मणेयाच्यासत्वाचीनकळेखोली ॥ सीमाझालीत
त्वतां ॥ ९९ ॥ तरीआतांपीडूंनयेतत्वतां ॥ केलीरायाचेमनींप्रेरकता ॥ चंद्रसे
नद्रवलाचित्ता ॥ ह्मणेअन्नउदकदेतजावें ॥ २०० ॥ अन्नउदकाचीआज्ञाझाली ॥
नगरजनांसिदयाआली ॥ तेआणोनिदेतनित्यकाळीं ॥ कनवाळुकृपाळुजन ॥
॥ १ ॥ अन्नउदकाचाहोतसेसुकाळ ॥ परंतुकरचरणावीणपांगुळ ॥ त्याअतिदुःखें
होतसेविव्हळ ॥ चैननपडेक्षणभरी ॥ २ ॥ ऐसींक्रमिलींवर्षेंदोन ॥ तोंवरीदुःख
सोशिलेंअतिदारुण ॥ ऐसेंकर्माचेंविंदान ॥ भोगिल्याविणसुटेना ॥ ३ ॥ तंवको

णेऐकेकेदिवशीं ॥ तेलीणबैसोनशिबिकेसीं ॥ जातहोतीसासऱ्यासी ॥ तयामार्गां
नें ॥ ४ ॥ त्यातेलिणीचेंमाहेर ॥ होतेंपैंउज्जयिनीनगर ॥ सासरेंतामलिंदापुरन
गर ॥ ऐसेंश्रोतींजाणावें ॥ ५ ॥ तेथीलतेलियानेंउज्जयिनीहुनी ॥ स्नुषाआणि
लीमूळकरोनी ॥ तंवतींत्यामार्गावरोनी ॥ येतहोतींउभयतां ॥ ६ ॥ तेव्हांत्या
तेलिणीनें ॥ पाहिलेंविक्रमाकारणें ॥ मनींह्मणेराजाकोणें ॥ आणिलासेयास्था
नीं ॥ ७ ॥ मगतीखालींउतरोनिकामिनी ॥ लागलीविक्रमाच्याचरणीं ॥ ह्मणे
हातापायांवाचोनी ॥ कोणअवस्थाशरीराची ॥ ८ ॥ राजाअवलोकीतेलिणीक
डे ॥ बाईविजयीअसोततुझेचुडे ॥ कायवृत्तांतग्रामाकडे ॥ तोसर्वसांगमज ॥

॥ ९ ॥ मगकामिनीह्मणेअहोराया ॥ सर्वसुखीआहेतकरुणालया ॥ परीहेअव
स्थातुमच्यादेहा ॥ कायह्मणोनिजाहली ॥ २१० ॥ रावह्मणेऐकेंपतिव्रते ॥ हा
कर्मभोगजाणनिरुतें ॥ ग्रहदशाफिरलीमातें ॥ हेंकर्तृत्वदेवाचें ॥ ११ ॥ मगसर्व
सांगितलेंतियेसीं ॥ जेंजेंवर्तलेंज्यासमयासी ॥ तेंऐकोनिह्मणेविक्रमासी ॥ धन्य
धन्यरेविधातिया ॥ १२ ॥ मगतीतेलीणकायकरित ॥ रायासिशिबिकेमाजीबैस
वीत ॥ आपुल्याग्रहासिघेऊनिजात ॥ अत्यादरेंकरूनियां ॥ १३ ॥ तंवतोतेली
कांपेथरथरा ॥ ह्मणेहेंविघ्नआणिलेंघरा ॥ जरीश्रुतहोईलराजेश्वरा ॥ मगकैसेंक
रावेंआपण ॥ १४ ॥ तेव्हांसूनह्मणेश्वशुरासी ॥ हाविक्रमादित्यनिश्चयेंसीं ॥ ध

श० मनीतींराज्यकरीउज्जयिनीसी ॥ परीहेदशाग्रहाची ॥ १५ ॥ हामाळवादेशींचा मा०
घनी ॥ जैसाउकिरड्यांतपडलाचिंतामणी ॥ दैवेंलाघलाआपणालागुनी ॥ ह्म
॥१९॥ णोनिआलाग्रहातें ॥ १६ ॥ मगतोतेलीकायकरी ॥ रायाचंद्रसेनाश्रुतकरी ॥ ॥१९॥
आपणतस्करटाकिलाजोबाहेरी ॥ हातपायखंडोनी ॥ १७ ॥ जरीआज्ञाहोईल
राजेश्वरा ॥ तरीआणीनतयातस्करा ॥ दयाउपजलीममअंतरा ॥ दीनअनाथ
ह्मणवोनी ॥ १८ ॥ मगरावह्मणेभलारेभला ॥ आणावेंतयातस्कराला ॥ प्रति
पाळकरींवहिला ॥ अन्नवस्त्रदेउनी ॥ १९ ॥ ऐसाहुकूमकेलारायानें ॥ मगतेली
आलाग्रहाकारणें ॥ तेव्हांतेलियासिविक्रमह्मणे ॥ गोष्टसांगतोंऐकाते ॥ २२० ॥

मगरावह्मणेमेहतरासी ॥ तुह्मींश्रुतनकरावेंकोणासीं ॥ विक्रमआहेममग्रहासीं ॥
ऐसेंकोठेंनवदावें ॥ २१ ॥ मगतोतेलीह्मणेराजेश्वरा ॥ घाणाहांकावामाझिया
घरा ॥ देईनमीअन्नआणिवस्त्रा ॥ऐसानेमपैंमाझा॥ २२ ॥ मगविक्रमह्मणेतेलि
यासी ॥ धन्यतुझीबुद्धीऐसी ॥ तुझाउपकारनंफिटेआह्मांसीं ॥ महासंकटींरक्षि
लें ॥ २३ ॥ऐसेंकरितांकांहींएकदिवस ॥ होतेझालेविक्रमास ॥ तयातेलियाचेग्र
हींरात्रंदिवस ॥ घाणाहाकीतसे ॥ २४ ॥ तंवसातवर्षेंपरिपूर्णझालीं ॥ पुढेंकथा
केसीवर्तली ॥ तेपाहिजेश्रवणकेली ॥ एकाग्रचित्तेंकरोनी ॥ २५ ॥ मगकोणेएके
दिवशीं ॥ सायंकाळजाहलीनिशी ॥ घाण्यावरअसतांविक्रमासीं ॥ बुद्धिकैसीआ

श० ठविली ॥ २६ ॥ तोदीपरागाचाअवसर ॥ ध्यानांतआणीराजेश्वर ॥ रागआ मा०
ळवीतसेमधुर ॥ सुस्वरकंठेंकरोनी ॥ २७ ॥ रागउद्धारकरितांप्रत्यक्ष ॥ दीपला
॥२०॥ गलेलक्षानुलक्ष ॥ जैसीदीपवाळीचदेख ॥ प्रकाशमाननगरांत ॥ २८ ॥ तंवएक
स्तंभाच्यामाडींत ॥ राजकन्याअतिरूपवंत ॥ नामेंपद्मसेनानिश्चित ॥ बैसली
सेआनंदें ॥ २९ ॥ तेव्हांतिनेंअवलोकिलाप्रकाश ॥ मगपाचारिलेंपरिचारिके
स ॥ ह्मणेकोणेंकेलेंदीपोत्सवास ॥ शोधकरूनिमजसांग ॥ ३० ॥ दीपवाळि
तोआजनाहीं ॥ आणिलग्नहीनसेकोठेंही ॥ तरीहेंआश्चर्यदिसतेंकांहीं ॥ पाहू ॥२०॥
नियावेंसत्वर ॥ ३१ ॥ इकडेदीपरागझालासंपूर्ण ॥ तेव्हांदीपमावळलेमुळींहू

न ॥ मगदुसराश्रीरागनामेंकरून ॥ तेथेंरागआळवीतसे ॥ ३२ ॥ पद्मसेनावदे
परिचारिकेसी ॥ हापुरुषरागज्ञानीविशेषीं ॥ रागआळवितोअतिसुरसीं ॥ को
ण्यास्थळींपहागे ॥ ३३ ॥ याचाआणावासमाचार ॥ धुंडाळावेंसकळनगर ॥
जेथेंअसेलतोनर ॥ येथेंआणाव्रेगेंसी ॥ ३४ ॥ तेव्हांपरिचारिकाचौघीजणी ॥
नगरींशोधकरितीतत्क्षणीं ॥ तंवतोतेलियाच्याघरींघाणी ॥ हाकीतसेचौरंगा ॥
॥ ३५ ॥ त्यापरतोनिराजकन्येसिसांगती ॥ कींचौरंगाकेलाजोनिश्चितीं ॥ तोत
स्करतेलियाच्यागृहाप्रती ॥ घाणाहाकीतबैसला ॥ ३६ ॥ तोचिकरीतआहेरंग
राग ॥ परीस्वरूपदिसताहेबेढंग ॥ जैसेंकांशिमग्याचेंसोंग ॥ ऐसियापरीदिस

ताहे ॥ ३७ ॥ मगपद्मसेनाह्मणेसाचार ॥ तरीघेऊनियातोतस्कर ॥ जीवेंभावें
करीनभ्रतार ॥ वेधलागलाअंतरीं ॥ ३८ ॥ परिचारिकाह्मणतीप्रमाण ॥ परीरा
याश्रुतकरावेंजाण ॥ ह्मणजेनलागेदूषण ॥ शब्दनयेआह्मावरी ॥ ३९ ॥ तेंव्हां
पद्मसेनाह्मणेतुह्मासकाई ॥ तयासियेथेंआणावेंपाहीं ॥ मगरायासिश्रुतकरीन
लवलाहीं ॥ तुह्मींमनींभिऊंनका ॥ २४० ॥ तेंव्हांपरिचारिकानिघाल्यातेथु
नी ॥ येत्याजाहल्यातेल्याचेदुकानीं ॥ मगत्यातेलियासिपुसोनी ॥ तयासिघेऊ
निचालिल्या ॥ ४१ ॥ एकस्तंभाच्यामाडीवरी ॥ तयासिनेलेंपैंसत्वरी ॥ मगत्या
तेंअवलोकूनिराजकुमारी ॥ अंतरींसंतोषली ॥ ४२ ॥ मगतेवदेचौरंगासी ॥ तु

ह्मींरागज्ञानीअतिविशेषीं ॥तरीआतांरागउद्धारकरावावेगेंसीं ॥ जेणेंतृप्तहोतीश्र
वणहे ॥ ४३ ॥ मगतोकरीरागोद्धार ॥ यथान्यायगातसेसुस्वर ॥ कंठत्याचाअ
तिमधुर ॥ जैसागंधर्वदूसरा ॥ ४४ ॥ ऐसाराजकन्येच्यामाडीवर ॥ रागरंगहो
तसेअपार ॥ तंवचंद्रसेनआपुल्यामाडीवर ॥ ऐकताझाला ॥ ४५ ॥ मगरावपु
सेपरिचारिकेसी ॥ आजिकुमारिकेच्यामहालासीं ॥ रंगहोतोदिवसनिशीं ॥ को
णेकार्यासिसांगपां ॥ ४६ ॥ मगदासीह्मणतीसमर्था ॥ हाअन्यायआह्मांसिला
विता ॥ परीहेनिजकन्येचीअवस्था ॥ आह्माकडेकायशब्द ॥ ४७ ॥ परंतुआ
मचीएकविनवणी ॥ येऊनिपाहावेंनिजनयनीं ॥ मगयेईलकळोनी ॥ अवस्थाते

थील ॥ ४८ ॥ पद्मसेनेचाविचार ॥ आह्मांसांगतांनयेसाचार ॥ ह्मणोनितेथेंच
लावेंसत्वर ॥ मगजेंकरणेंतेंकरावें ॥ ४९ ॥ तंवत्याराायासिनिद्राआली ॥ पुढें
कथाकैसीवर्तली ॥ तीपाहिजेश्रवणकेली ॥ एकाग्रचित्तेंकरोनियां ॥ २५० ॥
राजाविक्रमत्यामाडीवर ॥ बैसलासेचिंतातुर ॥ तंवसाडेसातवर्षेंसाचार ॥ भर
लींशनिदेवाचीं ॥ ५१ ॥ राजामनींचिंताकरित ॥ ह्मणेकेंव्हांउज्जयिनीहोईल
प्राप्त ॥ क्लेशभोगिलेअत्यंत ॥ परीकृपानकरीग्रहस्वामी ॥ ५२ ॥ ऐसारावचिं
ताकरित ॥ तंवतेथेंकायवर्तलीमात ॥ शनिदेवहोऊनिकृपावंत ॥ संमुखउभा
ठाकला ॥ ५३ ॥ ह्मणेऐकरायाविक्रमसेना ॥मजनओळखसीअज्ञाना ॥ अद्या

पिअनुभवतवमना ॥ आलाकिंवानाहीं ॥ ५४ ॥ मगरावउठूंपाहेझडकरोन ॥
परीतेनाहींतकरचरण ॥ तेव्हांतैसाचभूमिशयन ॥ लोटांगणघालीतसे ॥ ५५ ॥
तेव्हांशनिवदेरायाविक्रमा ॥ धन्यधन्यतुझामहिमा ॥ आतांमीप्रसन्नराजोत्त
मा ॥ इच्छाअसेलतेंमाग ॥ ५६ ॥ तंवविक्रमसद्गदबोलेवचन ॥ ह्मणेमनुष्यदे
हानपीडींजाण ॥ हेंचिद्यावेंमजवरदान ॥ कृपाळुवाशनिदेवा ॥ ५७ ॥ म्यांदुःख
सोशिलेंअनिवार ॥ ऐसेंप्राण्यासिनाहींसोसवणार ॥ तरीतूंकोणासिनपीडींसा
चार ॥ हेंचिमागणेंशनिदेवा ॥ ५८ ॥ ऐसेंऐकोनिशनिदेव ॥ ह्मणेधन्यधन्यतूंवि
क्रमराव ॥ परपीडेचाअनुभव ॥ जाणतोसीनिजांतरीं ॥ ५९ ॥ तूंनमागसीहा

तपाय ॥ राजछत्रादिसुखोपाय ॥ तरीतुजईश्वरह्मणोंये ॥ परदुःखनिवारिसी ॥
॥ २६० ॥ मगकृपाउपजलीशनिदेवासी ॥ रावकरचरणादिरूपासी ॥ पहिल्या
हुनीअतिविशेषीं ॥ सुंदरकायापैंकेली ॥ ६१ ॥ मगरावशनिदेवाचेचरणधरी ॥
ह्मणेकृपाळुवाकृपाकरीं ॥ हेंचिमागणेंसाचारी ॥ नकरींपीडाकोणासी ॥ ६२ ॥
मगरायातेंशनिदेवबोले ॥ म्यांकायतुजदुःखदीधलें ॥ दुःखगुरुनाथेंपाहिलें ॥ ते
कष्टकोणेरीतीं ॥ ६३ ॥ तुजदुःखदाखविलेंकिंचित ॥ म्यांकैसेत्राशिलेदेवदैत्य ॥
तेंश्रवणकरींनिश्चित ॥ गुरुपीडाअवधारीं ॥ ६४॥ ऐकेदिवशींप्रातःकाळीं ॥ नम
नकेलेंगुरुमाउली ॥ मगहस्तजोडोनितेवेळीं ॥ विनंतीकरींतयांसीं ॥ ६५ ॥ अ

होजीश्रीगुरुनाथा ॥ मीतुमच्याराशीयेतोंआतां ॥ तरीमान्यकरींकृपावंता ॥ सा
डेसातवर्षांतें ॥ ६६ ॥ मगगुरुह्मणेगामजसी ॥ तुवांकृपाकरावीआह्मांसी ॥ न
यावेंआमुच्याराशी ॥ घडीएकजाणपां ॥ ६७ ॥ मगमीवदलोंतेवेळां ॥ तुह्मी
करितांमाझाकंटाळा ॥ तरीमजथारानाहींदयाळा ॥ कोणीनकरीमान्यमज ॥
॥ ६८ ॥ तरीपांचवर्षेंमान्यकरीं ॥ अथवाअडीचपर्षेंपदरींधरीं ॥ अडचावर्षां
चीपरी ॥ थोडकीचअसे ॥ ६९ ॥ परीतेंनमानीचगुरू ॥ मगमीह्मणेनघडेनि
र्धारू ॥ पुन्हांमनींकेलाविचारू ॥ कींगुरूसीनगांजावें ॥ ७० ॥ गुरुकेवळमाय
माउली ॥ सदाकृपेचीकरीसाउली ॥ गुरुवचननमानितांयेवेळीं ॥ अधःपातप्रा

प्रहोय ॥ ७१ ॥ तेवेळांमीलागलोंचरणीं ॥ विनंतिकरीतविनीतवचनीं ॥ मीप्र
सन्नतुजग्रहशनी ॥ मागमागगुरुनाथा ॥ ७२ ॥ तेव्हांगुरुह्मणेशनैश्वरा ॥ आ
ह्मावरीकृपाकरा ॥ नयावेंआमुच्याशरीरा ॥ हेंचिआतांमागतसें ॥ ७३ ॥ मग
मीप्रसन्नझालोंतेक्षणीं ॥ साडेसातप्रहरयेतोंह्मणूनी ॥ तुह्मीमान्यनकेल्यासर्व
प्राणी ॥ नमानितीमजलागीं ॥ ७४ ॥ मगगुरुदेवह्मणेप्रमाण ॥ तरीसवाप्रहर
येणेंजाण ॥ तेंम्यांमान्यकेलेंवचन ॥ मगआज्ञादीधलीगुरूनें ॥ ७५ ॥ गुरुवि
चारकरीनिजमानसीं ॥ स्नानसंध्यास्वकर्मासी ॥ करितांदवडीनसवाप्रहरासी ॥
मगतोशनीकायकरील ॥ ७६ ॥ ऐसागर्वधरिलामनांत ॥ तोमजकळलावृत्तांत ॥

मगम्यांविचारिलेंचित्तांत ॥ कांहींचमत्कारदाखवूं ॥ ७७ ॥ तंवतेआलीग्रहाची
वेळ ॥ तेव्हांगुरुजाहलाउतावेळ ॥ ह्मणेमृत्युलोकींगंगाजळ ॥ तरीस्नानाला
गींपैंजावें ॥ ७८ ॥ शनिग्रहाचीपडतांछाया ॥ तेव्हांपालटलीगुरुकाया ॥ मग
फकीरवेषैंतयाठाया ॥ शनैश्वरपातला ॥ ७९ ॥ तयापासींहोतींखर्बुजेंदोन ॥ तीं
केलींगुरूसीअर्पण ॥ मगगुरुहर्षयुक्तहोऊन ॥ दोनपैसेदेततया ॥ २८० ॥ मग
स्नानकरोनितेवेळीं ॥ धोत्रांतफळेंबांधिलीं ॥ झारीशोभेकरकमळीं ॥ चालि
लेतेमार्गानें ॥ ८१ ॥ तंवपुढेंदिसेएकनगरी ॥ तेथेंकायझालीनवलपरी ॥ राव
प्रधानसमसरीं ॥ दोनपुत्रदोघांसी ॥ ८२ ॥ तेउभयतांत्यादिवशीं ॥ गेलेहोते

शिकारीसी ॥ दोनप्रहरझालेतयांसी ॥ वाटपाहेराजेंद्र ॥ ८३ ॥ तंवतेयेतांदिसे
ना ॥ इकडेउशीरझालाभोजना ॥ तेव्हांसेवकांसकेलीआज्ञा ॥ धुंडूनिआणादो
घांसी ॥ ८४ ॥ मगतेसेवकनिघालेसत्वर ॥ लगबगांआलेगांवाबाहेर ॥ तंवतो
पुढेंदेखिलाविप्र ॥ हातींझोळीखरबुजांची ॥ ८५ ॥ तंवशनैश्चरेंकेलीमाव ॥ फ
ळांचींमस्तकेंजाहलींसावयव ॥ सेवकींओळखिलाब्रह्मदेव ॥ ह्मणतीतुह्मापा
सींकायआहे ॥ ८६ ॥ ब्राह्मणह्मणेसेवकांसी ॥ खर्बुजेंघेतलींफराळासी ॥ से
वकह्मणतीरुधिरासी ॥ स्रावहोतोदिसताहे ॥ ८७ ॥ तूंब्राह्मणकिंवाशूद्र ॥ व
स्त्रांतूनिगळेरुधिर ॥ कायआहेतेंसत्वर ॥ दाविजेपैंआह्मांसी ॥ ८८ ॥ मगगुरु

जाहलाभयभीत ॥ ह्मणेहेअघटितकायवदत ॥ अधोदृष्टीझोळीपहात ॥ तंवतें रुधिरप्रत्यक्ष ॥ ८९ ॥ सेवकझोळीघेतींहिरोन ॥ मगतेपाहतीसोडोन ॥ तंवशि रकमळेंनिघालींदोन ॥ प्रधानराजपुत्रांचीं ॥ २९० ॥ सेवकह्मणतीरेचांडाळा ॥ महादुष्टापतिताखळा ॥ ब्रह्मवंशींअमंगळा ॥ दयानाहींतुजअंतरीं ॥ ९१ ॥ म गतेक्रोधयुक्तमानसीं ॥ बंधनकरितिब्राह्मणासी ॥ मारितमारिततयासी ॥ राया पाशींआणिला ॥ ९२ ॥ रायासन्मुखउभाकरून ॥ सेवकसांगतीवर्तमान ॥ हा बाळहत्यारीब्राह्मण ॥ यानेंउभयतांसिमारिलें ॥ ९३ ॥ ऐकतांचिरायासिआ लीमूर्छना ॥ मनींह्मणेकैसेंकेलेंनारायणा ॥ एकपुत्रहोतातोहीमना ॥ नाहींआ

लातुझ्याकीं ॥९४॥ ब्राह्मणनोहेहाकाळ ॥ यानेंगिळिलामाझाबाळ ॥ तरीयासि
नेऊनतत्काळ ॥ सुळावरीदेइंजे ॥ ९५ ॥ ऐसाहुकूमहोतांरायाचा ॥ सूळकरवि
लालेखंडाचा ॥ नेउनीरोंविलापैंसाचा ॥ नगराबाहेरी ॥ ९६ ॥ तंवभृगूचिया
मंदिरांत ॥ वर्तमानझालेंश्रुत ॥ तेव्हांएकचिवर्तलाआकांत ॥ तोलिहितांग्रंथ
विस्तारेल ॥ ९७ ॥ परीराजपुत्राचीकामिनी ॥ पतिव्रतालावण्यखाणी ॥ वार्ता
ऐकतांतत्क्षणीं ॥ सतीजावयासिद्धझाली ॥ ९८ ॥ आतांइकडेगुरुनाथासी ॥
घेऊनगेलेसुळापासीं ॥ तेव्हांनसुचेकांहींगुरूसी ॥ ग्रहदशेनेंवेष्टिला ॥ ९९ ॥
मगगुरुवदेसेवकांला ॥ आतांसुळींनद्यावेंआह्मांला ॥ दहासहस्त्ररुपयेतुह्मा

ला ॥ देतोंक्षणभरीथांबावें ॥ ३०० ॥ दोनघटिकाआह्मांसी ॥ सुळींनद्यावेंनि
श्चयेंसी ॥ मगअवलोकावेंनेत्रेंसी ॥ कैसेंहोईलतें ॥ १ ॥ ऐसेकरुणाशब्दबोलतां
तयां ॥ मगत्यासेवकांसिआलीदया ॥ तेव्हांतेह्मणतीदोनघटिकाथांबोनियां ॥
मगदेऊंसुळावरी ॥ २ ॥ ऐसेंबोलतांबोलतांजाण ॥ सवाप्रहरझालापरिपूर्ण ॥
प्रधानराजपुत्रदोघेजण ॥ आलेवारूसहित ॥ ३ ॥ जेणेंरायासिजाणविलें ॥
त्याचेंदरिद्रदूरकेलें ॥ मगसेवकांसिआज्ञापिलें ॥ सुळींनद्यावेंब्राह्मणा ॥ ४ ॥
तेव्हांसेवकधांवलेसत्वर ॥ येऊनिनगराबाहेर ॥ सांगितलासमाचार ॥ सुळीं
नद्यावेंब्राह्मणा ॥ ५ ॥ मगतोआणिलारायापासीं ॥ उभाराहिलासंमुखेंसीं ॥

आशीर्वाददेऊनिरायासीं ॥ आपुलावृत्तांतनिवेदिला ॥ ६ ॥ ऐकोनिरावजाह
लासद्गदित ॥ ह्मणेमजनव्हतेंविदित ॥ मीदूषणलावोनिवधित ॥ होतोंतुह्मांगु
रुराया ॥ ७ ॥ धिग्धिग्हासंसार ॥ मीमहापापीअनिवार ॥ केवढाकेलाअवि
चार ॥ राज्यमदेंकरोनी ॥ ८ ॥ तेव्हांसद्गदितजाहलानृपती ॥ गुरुचरणधरिले
प्रीतीं ॥ स्फुंदस्फुंदोनिरडेनिश्चितीं ॥ मीअपराधीगुरुराया ॥ ९ ॥ नेणतपणेंजा
हलाविचार ॥ तोक्षमाकरींसाचार ॥ मगहातधरोनिसत्वर ॥ सिंहासनींबैसवि
ला ॥ ३१० ॥ मगगुरुह्मणेऐकभूपाळा ॥ हाअन्यायनाहींतुजला ॥ हीशनैश्च
राचीकळा ॥ दुःखदाविलेंतयानें ॥ ११ ॥ मगझोळीआणोनिपाहती ॥ तंवतीं

खर्बुजेंचदिसती ॥ शिरकमळांचीआकृती ॥ अदृश्यझालीतत्काळ ॥ १२ ॥ अ
सोरायेंकरविलेंभोजन ॥ गुरुपंक्तीसबैसलाआपण ॥ आणखींहीदिव्यब्राह्मण ॥
सर्वहीतृप्तिपावले ॥ १३ ॥ मगगुरूसिवस्त्रेंभूषणें ॥ दीधलींरायाभृगूनें ॥ ते
व्हांआज्ञाघेऊनिगुरूनें ॥ प्रयाणकेलेंतेथोनी ॥ १४ ॥ मगशनिदेवआलेगुरू
पाशीं ॥ नमनकेलेंसाष्टांगेंसीं ॥ ह्मणेवर्तणूकजाहलीकैसी ॥ तीसांगावीगुरुना
था ॥ १५ ॥ गुरुह्मणेबापाशनैश्वरा ॥ सवाप्रहरांतकेलामाझामातेरा ॥ साडेसा
तवर्षेंयेतासिखरा ॥ तरीमगकायहोतेंकळेना ॥ १६ ॥ तूंग्रहामाजीग्रहश्रेष्ठ ॥
जीवासिदेसीबहुकष्ट ॥ मीगुरुतुजअतिश्रेष्ठ ॥ बराउपकारफेडिला ॥ १७ ॥ अ

॥२८॥ सोजेंजाहलेंतेंबरेंझालें ॥ परीऐसेंकोणानकष्टवींवहिलें ॥ तुजशपथमाझीयेवे
ळे ॥ शनिग्रहासमर्था ॥ १८ ॥ मगशनिदेवह्मणेगुरूसी ॥ गर्वनधरावामान
सीं ॥ गर्वधरीलत्यापुरुषासी ॥ ऐसेंचमीगांजीन ॥ १९ ॥ गुरुजीतुह्मांसगर्व
जाहला ॥ ह्मणोनिहाअपराधघडला ॥ तरीक्षमाकरींबाळकाला ॥ अपराधपो
टींघालिजे ॥ ३२० ॥ मगशनिगेलाशिवापाशीं ॥ ह्मणेआतांयेतोंमीतुह्मासी ॥
तंवशंभुह्मणेआह्मासी ॥ कायकरिसीयेऊनी ॥ २१ ॥ परीयेसीतेव्हांसांगूनये
णें ॥ ऐसेंउभयतांझालेंबोलणें ॥ मगदुसरेदिवशींशनीनें ॥ येतोंह्मणोनिसुच ॥२८॥
विलें ॥ २२ ॥ शंकरेंऐकोनिवचनासीं ॥ क्षणएकलपालाकैलासीं ॥ मगवदते

झालेशनीसी ॥ तुवांआमुचेंकायकेलें ॥ २३ ॥ मगशनिह्मणेमहादेवा ॥ तुम
चाधाकत्रिभुवनींसर्वां ॥ मजभेणेंलपलांतिदेवाधिदेवा ॥ हेंकायथोडेंअसे ॥
॥ २४ ॥ ऐकोनिहास्यकरीकैलासराज ॥ ह्मणेधन्यतुझेंउग्रतेज ॥ मगमातेंकृ
पाकरूनसहज ॥ आज्ञादेताजाहला ॥२५॥ मगग्रहआलारामचंद्रासी ॥ वन
वासभोगविलातयासी ॥ आणिग्रहयेतांसीतेसी ॥ रावणेंचोरूनिपैंनेलें ॥२६॥
रावणाच्यामंचकाखालते ॥ नवग्रहहोतेपालथे ॥ त्यांवरीमंचकठेवूनिनिरुतें ॥
रावणपहुडेनित्यकाळीं ॥ २७ ॥ मगतेथेंआलेनारदमुनी ॥ तेवदतेझालेमजला
गुनीं ॥ तूंग्रहश्रेष्ठमहाअभिमानी ॥ ऐसीदशातुमची ॥ २८ ॥ तरीयेथेंतुमचें

शा० ‖२९‖ कांहींनचाले ॥ गरीबासिकष्टवितांबळें ॥ हेंसामर्थ्यनव्हेआगळें ॥ उगाचिपु माo
रुषार्थभोगितां ॥ २९ ॥ मगमीशनिवर्देंनारदासी ॥ आह्मीपालथेतेसोईचेक
‖२९‖ रविसी ॥ मगपाहेंपराक्रमासी ॥ कैसाआहेतोदावीन ॥ ३३० ॥ नारदह्मणेमी
ऐसेंकरीन ॥ ऐसेंबोलोनियांवचन ॥ मगरावणापासींजाऊन ॥ सांगेतयासि
विचार ॥ ३१ ॥ ह्मणेग्रहपालथेघालून ॥ मंचकींनिद्राकरिसीरात्रंदिन ॥ तरी
हेंअनुचितअसेजाण ॥ वैरियांच्याउरावरिपायद्यावा ॥ ३२ ॥ तेंवचनरावणा
मानलें ॥ मगपालथेतेसोईचेकेले ॥ मगतेथेंकायवर्तलें ॥ तेंपरिसावेंसज्जनीं ॥ ‖२९‖
॥ ३३ ॥ दृष्टिफिरवितांशनैश्वर ॥ षण्मासांतसहपरिवार ॥ निर्दाळीश्रीरामचं

द्र ॥ पुत्रपौत्रांसहित ॥ ३४ ॥ हरिश्चंद्रासीआलाशनी ॥ बारावाक्रूरस्थानीं ॥
पीडिताझालाकौशिकमुनी ॥ राज्यभ्रष्टतोकेला ॥ ३५ ॥ पुढेंअतिदुःखदीधलेंत
यासी ॥ स्त्रीपुत्रादिघातलेविक्रयासी ॥ स्वयेंविकलाडोंबासी ॥ तेथेंहिजाचिलें
बहुत ॥ ३६ ॥ ऐसेंकष्टविलेंराजोत्तमा ॥ दमयंतीप्राणमनोरमा ॥ दुःखदीधलें
विक्रमोत्तमा ॥ पीडियेलीदमयंती ॥ ३७ ॥ ग्रहआलाइंद्रराया ॥ भोगिलीगौत
माचीजाया ॥ भगांकितजाहलीसर्वकाया ॥ ऋषिशापेंकरूनियां ॥ ३८ ॥ ग्रह
आलाचंद्रासी ॥ स्पर्शकेलागुरुपत्नीसी ॥ कलंकलागलादेहासी ॥ ऐसेंझालें
जाणपां ॥ ३९ ॥ ग्रहआलावसिष्ठासी ॥ क्षयजाहलाशतपुत्रांसी ॥ तैसेंचपीडि

लेंपराशरासी ॥ मत्स्यगंधाभोगिली ॥ ३४० ॥ पांडवग्रहदशाभोगित ॥ राज्य
हरवूनिगेलेवनांत ॥ कौरवांचाक्षयकेलाक्षणांत ॥ ग्रहयेतांचितत्काळीं ॥ ४१ ॥
॥३०॥ तैसाचिश्रीकृष्णासीग्रहआला ॥ स्यमंतकाचाडागलागला ॥ तोकोणत्याकार
णेंनिघाला ॥ हरिविजयींतिकथा ॥ ४२ ॥ मगकृष्णह्मणेशनैश्वरा ॥ तूंमहास
मर्थहोसीखरा ॥ सर्वत्रांसितुझादरारा ॥ देवदानवांदिकांसी ॥ ४३ ॥ ऐसेंदेवा
दिकांसित्रासिलें ॥ त्यांततुजलाकांहींसेंदुःखदीधलें ॥ किंचित्‌चमत्कारासीदा
विलें ॥ समजावयातुजलागीं ॥ ४४ ॥ मगाविक्रमउठेझडकरी ॥ साष्टांगनम ॥३०॥
स्कारकरी ॥ धन्यशनैश्वराअवधारीं ॥ पावनकेलेंमजलागीं ॥ ४५ ॥ आतां

मीतुजअनन्यशरण ॥ कृपाकरींअनाथालागुन ॥ हेंचिद्यावेंवरदान ॥ नपीडीं
प्राणिमात्रासी ॥ ४६ ॥ मगशनिह्मणेविक्रमासी ॥ धन्यतूंपरोपकारीहोसी ॥
परपीडानिवारितोसी ॥ उपमानाहींतुजलागीं ॥ ४७ ॥ तेव्हांप्रसन्नजाहलाशनै
श्वर ॥ रायासिदेताजाहलानिजवर ॥ हाग्रंथश्रवणपठणकरीजोनर ॥ तयासि
पीडानकरींमी ॥ ४८ ॥ भावेंकरितीश्रवणपठण ॥ आदरेंग्रंथसंरक्षण ॥ त्यांसि
रक्षींमीरात्रंदिन ॥ कृपाकरोनिसर्वथा ॥ ४९ ॥ जोकांश्रवणपठणनकरी ॥ आ
णिग्रंथाचीहेळणाकरी ॥ तयानराच्याशरीरीं ॥ पीडाफारकरीनमी ॥ ३५० ॥
श्रवणपठणाचाऐकाविचार ॥ नित्यअथवाशनिवार ॥ श्रवणपठणकरीजोनर ॥

उपोषणेंअतिसंतोषे ॥ ५१ ॥ जरीनकरवेउपोषणासी ॥ तरीश्रवणकरावेंअह
र्निशीं ॥ तेणेंसंतोषममानसीं ॥ मगपीडानकरींतत्वतां ॥ ५२ ॥ हेंवचनमा
झेंनेमस्त ॥ विक्रमासिभाषदेत ॥ त्यानरासिमीभाग्यवंत ॥ करीनजाणनिर्धा
रें ॥ ५३ ॥ ऐसावरदेऊनिरायासी ॥ शनिदेवगेलेनिजस्थानासी ॥ पुढेंकथा
वर्तलीकैसी ॥ तीश्रवणकरावीश्रोतेहो ॥ ५४ ॥ राजकन्येच्यामाडीवर ॥ वि
क्रमासिभेटलेशनैश्वर ॥ तेव्हांरायाचेंदिव्यजाहलेंशरीर ॥ जैसासूर्यप्रगटला
॥ ५५ ॥ तंवचंद्रसेनरावआला ॥ पाहेतंवदेखेविक्रमाला ॥ जैसामदनाचापु
तळा ॥ तटस्थझालामानसीं ॥ ५६ ॥ मगतीपद्मसेनाराजकुमरी ॥ रायाविक्र

मातेंवरी ॥ रावपुसेतेअवसरीं ॥ आपणकोणमहाराज ॥ ५७ ॥ विक्रमवदेसा
चार ॥ मीतुमचाअसेंचोर ॥ श्रीपतिवैश्यसावकार ॥ बोलावातयासी ॥ ५८ ॥
तंवतेधांवलीसेवकांचीमांदी ॥ वैश्यबैसलाहोतागादी ॥ ह्मणतीबोलाविलेंरायें
आदीं ॥ सत्वरतेथेंचलावें ॥ ५९ ॥ वैश्यउठलाझडकरून ॥ येऊनिरायासिक
रीनमन ॥ रावह्मणेवैश्यालागुन ॥ हाचितस्करहोयकीं ॥ ३६० ॥ वैश्यह्मणेरा
यासी ॥ आतांचलाममंदिरासी ॥ अवश्यह्मणोनिवेगेंसी ॥ चित्रशाळेसींपा
तले ॥ ६१ ॥ तंवचित्रींचानिर्जीवहंस ॥ जेणेंगिळिलेंहोतेंहारास ॥ तोपुन्हाउ
गाळीसावकाश ॥ जैसाहोतातैसाचि ॥ ६२ ॥ हारउगाळितांहंसानें ॥ तोपा

हिलासर्वजनें ॥ हेंआश्चर्यसकळांकारणें ॥ ह्मणतीहेंअघटित ॥ ६३ ॥ मगतो
वैश्यवाणी ॥ बहुसंतोषलानिजमनीं ॥ कन्याअर्पूनिचरणीं ॥ विक्रमाच्यालाग
 ला ॥ ६४ ॥ जनह्मणतीअघटितकळा ॥ निर्जीवलेपेंहारगिळिला ॥ दोषला
विलामहापुरुषाला ॥ तेंआजिकळोंआलें ॥ ६५ ॥ चंद्रसेनपुसेविक्रमासी ॥
आपणराहतांकोणेदेशीं ॥ कोणनामकोणवंशीं ॥ जन्मतुमचेंसांगावें ॥ ६६ ॥
तंवविक्रमह्मणेचंद्रसेना ॥ कायपुससीविचक्षणा ॥ मीअसेंउज्जनीचाराणा ॥
नामतरीविक्रम ॥ ६७ ॥ ऐसेंऐकतांराजेश्वर ॥ घालीसाष्टांगनमस्कार ॥ ह्मणे 
अन्यायघडलाथोर ॥ कृपाकरींदयाळा ॥ ६८ ॥ तेव्हांचकींअसतेंश्रुत ॥ तरी

कष्टकांहोतेप्राप्त ॥ नकळतांझालेंअनुचित ॥ त्यासिउपायकायसा ॥ ६९ ॥
विक्रमह्मणेराजेश्वरा ॥ हाआमुच्याग्रहदशेचाफेरा ॥ पूजननकेलेंशनैश्वरा ॥ ह्म
णोनिकष्टपावलों ॥ ३७० ॥ जंवग्रहनव्हतासानुकूल ॥ ह्मणोनितवबुद्धिविक
ळ ॥ आतांग्रहजाहलासानुकूळ ॥ ह्मणोनिऐसेंवदतोसी ॥ ७१ ॥ असोराया
नेंसोहळाकेलाफार ॥ फोडिलेंद्रव्याचेंभांडार ॥ धर्मकेलाअपार ॥ याचकजन
संतोषती ॥ ७२ ॥ मगतोतेलीबोलाविला ॥ विक्रमेंतयासिनमस्कारकेला ॥
एकदेशतयादेवविला ॥ सुखीकेलातयेवेळीं ॥ ७३ ॥ चंद्रसेनहर्षभरित ॥ ह्मणे
ममभाग्यासिनाहींअंत ॥ विक्रमजोडलाजामात ॥ धन्यमीएकसंसारीं ॥७४॥

ऐसेंकरितांएकमास ॥ झालारायाविक्रमास ॥ मगपुसोनियांचंद्रसेनास ॥ आ
झामागतसेनृपती ॥ ७५ ॥ मगचतुरंगदळसिद्धकरून ॥ हत्तीघोडेदासदासी
जाण ॥ देशपट्टणेंग्रामदेऊन ॥ जामातासिबोळविलें ॥ ७६ ॥ तंवत्यासावकारें
आपण ॥ नानावस्तूअनर्घ्यरत्न ॥ विक्रमासिदेऊन ॥ बोळवणकेलीकन्येची ॥
॥ ७७ ॥ असोसवेंघेऊनदळभार ॥ उज्जयिनीसिआलाराजेश्वर ॥ नगरश्रृंगा
रिलेंसत्वर ॥ अतिआनंदहोतसे ॥ ७८ ॥ मगसुमुहूर्तपाहोनी ॥ विक्रमबैस
विलासिंहासनीं ॥ याचकतृप्तकेलेदानीं ॥ चिंताचित्तींअसेना ॥ ७९ ॥ मगहें
शनैश्चरव्रत ॥ राजाविक्रमआचरत ॥ पीडागेलीसमस्त ॥ शनिप्रसादेंकरोनी ॥

॥ ३८० ॥ हीमहाराष्ट्रभाषेचीकथा ॥ परीअर्थाविषयींनाहींन्यूनता ॥ यथाम
तीवर्णिलीतत्वतां ॥ श्रवणकराभाविकहो ॥ ८१ ॥ हाग्रंथकरितांश्रवण ॥ सक
ळविघ्नेंजातीनिरसून ॥ ग्रहपीडाअतिदारुण ॥ नबाधीकदाकल्पांतीं ॥ ७२ ॥
ऐकतांकथानवग्रहांची ॥ येणेंपीडानिवारेक्लेशांची ॥ वार्ताहिनुरेदुःखाची ॥ कृ
पाकरितीग्रहसर्व ॥ ८३ ॥ श्रवणपठणींनिजध्यास ॥ लेखकपाठकसर्वांस ॥ ग्रं
थसंरक्षीतयांस ॥ क्लेशविघ्नेंनबाधितीकदा ॥ ८४ ॥ हीशनैश्वराचीख्याती ॥
केवळशनैश्वराचीमूर्ती ॥ अहर्निशींजेकांध्याती ॥ त्यांसिसंरक्षीशनिदेव ॥८५॥
सकळदुःखदरिद्र ॥ येणेंनिरसेसमग्र ॥ भावेंश्रवणकरितांसाचार ॥ फळप्राप्तत

शं०　　　　　　　　　　　　　　　　　　　　　　　　　　　　　　आ०

॥३४॥

यासी ॥ ८६ ॥ ह्मणेतात्याजीमहिपती ॥ हेप्रीतिअसेशनैश्वराप्रती ॥ कृपाळू
तोग्रहमूर्ती ॥ निर्विघ्नकरीसर्वांसी ॥ ८७ ॥ इतिश्रीशनैश्वराचीकथा ॥ त्याचा
तोचवदविता ॥ आपुलीतोमायिकवार्ता ॥ करविताश्रीपांडुरंग ॥ ३८८ ॥
॥ इतिश्रीशनैश्वरमाहात्म्यंसंपूर्णम् ॥ ॥ श्रीशनैश्वरार्पणमस्तु ॥

## ॥ आरती शनैश्वराची ॥

जयजयश्रीशनिदेवा, पद्मकरशिरिंठेवा ॥ आरतीओवाळीतों, मनोभावेंकरू
निसेवा ॥ ज० ॥ धृ० ॥ सूर्यसुताशनिमूर्ती, तुझीअगाधकीर्ती ॥ एकमुखेंका ॥३४॥
यवर्णू, शेषानचलेस्फूर्ती ॥ ज० ॥ १ ॥ नवग्रहांमाजीश्रेष्ठ, पराक्रमथोरतुझा ॥

ज्यांवरीतूंकृपाकरसी, होयरंकाचाराजा ॥ ज० ॥ २ ॥ विक्रमासारखाहो, शक
कर्तापुण्यराशी ॥ गर्वधरितांशिक्षाकेली, बहुछळियेलेंत्यासी ॥ ज० ॥ ३ ॥ शं
कराच्यावरदानें, गर्वरावणेंकेला ॥ साडेसातीयेतांत्यासी, समूळनाशासिने
ला ॥ ज० ॥ ४ ॥ प्रत्यक्षगुरुनाथा, चमत्कारदावियेला ॥ नेउनीशूळापाशीं,
पुन्हासन्मानकेला ॥ ज० ॥ ५ ॥ ऐसेगुणकितीगाऊं, धणीनपुरेगातां ॥ कृपा
करींदीनावरी, महाराजासमर्था ॥ ज० ॥ ६ ॥ दोन्हीकरजोडुनीयां, रखमाली
नसदापायीं ॥ प्रसादहाचिमागे, उदयकाळसौख्यदावीं ॥ जयज० ॥ ७ ॥

हें पुस्तक मुंबई येथें नारायण रामचंद्र सोहनी यांनीं आपल्या 'जगदीश्वर' छापखान्यांत छापिलें. शके १८१५.



॥ इति शनिमाहात्म्य समाप्तः ॥

